सन २०२४-२५ करिता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत मंजूर “शबरी आदि पर्यटन” योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आविवि- २०२५/प्र.क्र.७६/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक: ३० मे, २०२५

**वाचा-**

१. जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या पत्र क्र F.No.११०१५/०२/२०२४/Grant (Part-I), दि. १५ ऑक्टोबर, २०२४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त PAC च्या दि.११.१०.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
२. मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय कार्यकारी समितीच्या (SLEC) दि.२०.०२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
३. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांच्या पत्र क्र.शआविविम/प्रकल्प/प्रशा/९८३/२०२५, दि.२० मे, २०२५ अन्वये प्राप्त प्रस्ताव.

**प्रस्तावना :-**

मध्य प्रदेश शासनाच्या Tribal Tourism Project च्या धर्तीवर राज्यात शबरी आदि-पर्यटन योजना राबविण्याबाबतच्या प्रस्तावास जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार यांच्या दिनांक ११ ऑक्टोबर, २०२४ रोजी पार पडलेल्या PAC बैठकीमध्ये भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत मान्यता देण्यात आली आहे. तसेच सदर प्रस्तावास दि.२०.०२.२०२५ रोजी पार पडलेल्या मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय कार्यकारी समितीची (SLEC) मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेच्या मार्गदर्शक सुचना दि. ३० मे, २०२५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. आता शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने सदर योजनेच्या रु.२३७४.०५ लक्ष रक्कमेच्या खर्चाचे अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने सादर केलेल्या सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या वर्षासाठी भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत मंजूर “शबरी आदि पर्यटन” या योजनेच्या अंमलबजावणीसाठी रु.२३७४.०५ लक्ष रकमेच्या कामांना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर योजनेसाठी येणा-या खर्चाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| अ.क्र. | तपशील | प्रती गाव रक्कम (लाखात) | २५ गावांसाठी एकूण रक्कम (लाखात) |
|---|---|---|---|
| १ | नवीन १० होमस्टे बांधकाम @ ₹५.०० लाख | ५०.०० | १२५०.०० |
| २ | प्रवेश बिंदू क्रिया, समिती सदस्यांचे प्रशिक्षण | ६.०० | १५०.०० |
| ३ | ग्राम पर्यटन समितीसाठी निधी | ५.०० | १२५.०० |
| ४ | ग्रामस्तरीय समन्वयक मानधन | ३.६० | ९०.०० |
| ५ | विपणन समर्थन, आयटी, वेब अनुप्रयोग, माहितीपत्रक, फोटोग्राफी | ५.०० | १२५.०० |
| ६ | सर्वोत्तम होमस्टेसाठी पुरस्कार | १.५० | ३७.५० |
| ७ | १० होमस्टेसाठी वास्तुविशारद सल्ला | ५.०० | १२५.०० |
| ८ | इन्व्हर्टर, उपकरणे आणि इतर पायाभूत सुविधा | ८.०० | २००.०० |
| ९ | स्मरणिका दुकान स्थापनेचा खर्च | ५.०० | १२५.०० |
| १० | स्वयंसेवी संस्था सुलभता व शबरी व्यवस्थापन खर्च | ४.०० | १००.०० |
| ११ | शबरी संनियंत्रण व मुल्यांकन शुल्क (२%) | १.८६२ | ४६.५५ |
| | **एकुण** | **९४.९६२** | **२३७४.०५** |

**३. सदर योजनेसाठी भारतीय संविधानाच्या अनु.२७५ (१) अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेला निधी खालीलप्रमाणे आहे:-**

| अ.क्र. | तपशील | प्रति गाव (₹ लाख) | २५ गावांसाठी (₹ लाख) |
|---|---|---|---|
| १ | नवीन होमस्टे बांधकाम @ ₹५.०० लाख (१० होमस्टे प्रति गाव) | ५०.०० | १२५०.०० |
| २ | ग्राम पर्यटन समितीसाठी निधी | ५.०० | १२५.०० |
| | **एकूण मंजूर रक्कम** | **५५.००** | **१३७५.००** |

सदर योजनेसाठी केंद्र शासनाने वरीलप्रमाणे मंजूर केलेला रु.१३७५.०० लक्ष इतका निधी भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५ (१) अंतर्गत अनुदान या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीतून तर ऊर्वरित रु.९९९.०५ लक्ष इतका निधी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मुल्यमापन व संनियंत्रण (लेखाशीर्ष क्र. २२२५ एफ़ २८१) या लेखाशिर्षाखालील मंजूर निधीतून पुढील तक्यात नमूद केलेल्या उद्दिष्टांसाठी उपलब्ध करुन देण्यात येईल:-

(रु.लाखात)

| योजना | लेखाशिर्ष | बाब | तपशील | निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मुल्यमापन व संनियंत्रण | २२२५एफ२८१ | १०-कंत्राटी सेवा | ग्राम स्तरावरील पर्यटन गाईड यांचे मानधन @ ₹ १०,००० प्रति महिना एकूण ३ वर्षांकरिता | ९०.०० |
| | | १७- संगणक खर्च | माहिती तंत्रज्ञान, संकेतस्थळ आधारित application, विपणन व्यवस्थेकरिता सहाय्य, प्रचार प्रसिद्धी, प्रसिद्धी पत्रके, छायाचित्रण, व्हिडीओ, इत्यादी | २००.०० |
| | | २१-पुरवठा व सामग्री | विद्युतीकरण व इतर पायाभूत सुविधा खरेदी | १२५.०० |
| | | | आदिवासी उत्पादने विक्री केंद्र उभारणे | १२५.०० |
| | | | योजनांचे मूल्यमापन व सनियंत्रण एकूण प्रकल्प किंमत रु. २३२७.५० लक्ष च्या २% | ४६.५५ |
| | | २६-जाहिरात व प्रसिद्धी | समिती सदस्यांचे प्रशिक्षण व क्षमता बांधणी, Entry point activities इत्यादी | १५०.०० |
| | | | उत्कृष्ट पर्यटन निवारा व व्यवस्था यांकरिता प्रोत्साहनपर पारितोषिक | ३७.५० |
| | | २८-व्यावयायिक सेवा | स्थापत्य तज्ञ व इतर बाबींसाठी सहाय्य १० पर्यटन निवारा प्रति गाव | १२५.०० |
| | | | योजनेची अंमलबजावणी | १००.०० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | | करणेसाठी संस्था व शबरी महामंडळ प्रशासकीय खर्च इत्यादी | |
| | | | **एकूण** | ९९९.०५ |

४. सदर योजनेच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील:-

## अटी व शर्ती

I. प्रस्तुत कामांकरिता केंद्र शासनाने रु.१३७५.०० लक्ष इतका निधी एक वेळ उपलब्ध करुन दिला आहे. तसेच केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीव्यतिरिक्त आवश्यक असलेला रु.९९९.०५ लक्ष इतका निधी राज्य योजनेतून उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. मंजूर निधीव्यतिरिक्त अधिकचा निधी केंद्र किंवा राज्य शासनाकडून उपलब्ध करुन दिला जाणार नाही. सबब, उपलब्ध निधीच्या मर्यादेतच काम करण्याची सर्वस्वी जबाबबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील. याबाबतचे कोणतेही दायित्व राज्य शासनाकडून स्विकारण्यात येणार नाही.

II. प्रस्तुत कामास तांत्रिक मंजूरी देण्यापूर्वी हे काम कोणत्याही पाटबंधारे/जलविद्युत पाणी पुरवठा प्रकल्पाच्या जलाशयाखाली जाण्याची शक्यता नाही किंवा अशा प्रकल्पामुळे या कामावर भविष्यात कोणताही परिणाम होणार नाही, याची खात्री करुन घेतली पाहिजे. याबद्दलचे योग्य नमुन्यातील प्रमाणपत्र प्रतिस्वाक्षरित करुन संबंधित अंमलबजावणी यंत्रणेच्या सक्षम प्राधिकारी यांनी या प्रकल्पाच्या कागदपत्रासोबत ठेवावेत.

III. प्रशासकीय मान्यतेतील काम अन्य कोणत्याही योजनेत/कार्यक्रमात समाविष्ट नाही, याची खातरजमा तांत्रिक मान्यता प्रदान करण्यापूर्वी करण्यात यावी.

IV. अंदाजपत्रकातील दराबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाचे परिपत्रक क्र. डिएसआर-१०९०/सीआर ६४५३ / नियो-३, दिनांक १४/०७/१९९३ मधील तरतूदींचे अनुपालन झाले असल्याबद्दल खात्री करुन घेण्यात यावी.

V. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या सर्व कामांसाठी निविदा काढणे/स्वीकारणे, कार्यारंभ आदेश देणे इत्यादी बाबतची कार्यवाही सक्षम प्राधिकाऱ्यांकडून करून घेण्याची जबाबदारी शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाची राहील.

VI. सदर कामांचे विस्तृत आराखडे तयार करण्यात आले असून त्यामध्ये सर्व बाबींचा ( विद्युतीकरण तसेच स्थापत्य विषयक अनुषंगीक बाबी इत्यादी) समावेश करण्यात आला आहे, अशी शासनाची धारणा आहे. तथापि, कार्यारंभ आदेश देताना अंमलबजावणी यंत्रणा यांनी सदर बाबींची पुनःश्च खात्री करावी.

VII. प्रस्तुत कामांची निविदा प्रक्रिया राबवितांना प्रशासकीय मान्यतेमध्ये अंतर्भूत सर्व बाबींची एकत्रित निविदा ( विद्युतीकरण तसेच स्थापत्य विषयक अनुषंगीक बाबी इत्यादी) राबविण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत कामांचे तुकडे पाडण्यात येऊ नयेत. काही अपवादात्मक परिस्थितीत कामाचे तुकडे पाडणे अनिवार्य असल्यास, अशा प्रकरणी सविस्तर कारणमिमांसेसह प्रस्ताव शासनास सादर करुन शासन मान्यतेने पुढील कार्यवाही करण्यात यावी.

VIII. ज्या कामासाठी निधी मंजूर झाला आहे, त्याच कामावर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. सदर मंजूर कामे केंद्र व राज्य शासनाने वेळोवेळी पत्रे, परिपत्रके, शासन निर्णयान्वये विहीत केलेल्या सुचनांनुसार करण्यात यावीत.

IX. सदर कामांना लागणारी जमीन उपलब्ध असल्याची खातरजमा करुन घ्यावी. सदर कामांसाठी शासनाकडून जमीन उपलब्ध करुन देण्यात येणार नाही.

X. सदर कामांसाठी सविस्तर सर्वेक्षण करण्यात यावे व जागेची स्थिती बघून सर्व तांत्रिक दृष्टीकोनातून विचार करून कामाचे सुयोग्य कार्यात्मक अंदाजपत्रक तयार करण्यात यावे.

XI. प्रस्तावित कामांच्या अंदाजपत्रकाची रक्कम ढ़ोबळमानाने दर्शविली असल्याने त्यापेक्षा कमी किंमतीत काम होण्याची शक्यता आहे. सबब, शिल्लक निधी शासनास समर्पित करण्यात यावा.

XII. उपरोक्त अटींची पूर्तता करण्याची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील. तसेच, अटींचे उल्लंघन केल्यास याबाबत होणाऱ्या आर्थिक नुकसानीची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील.

XIII. प्रशासकीय मान्यतेच्या अंदाजपत्रकात प्रत्येक दराचे वर्णन/दर/दर पृथ:करण/रक्कम /दर पृथ:करणातील गृहित धरलेली अंतरे व अनुषंगिक इतर बाबी तांत्रिक मान्यता प्रदान करण्यास सक्षम अधिका-यांनी त्यांच्या पातळीवर तपासणे अनिवार्य आहे. या संदर्भात शासनाचे कोणतेही उत्तरदायित्व असणार नाही.

XIV. सदरील कामे हाती घेण्यापूर्वी संबंधित क्षेत्रात जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायतीच्या सार्वत्रिक निवडणुकांसाठी आचारसंहिता अंमलात नाही, याबाबत जिल्हाधिकारी यांनी खात्री करावी. तसेच कामांची व्दिरूक्ती होणार नाही, कामे दर्जेदार व चांगल्या प्रतीचे असल्याबाबत जिल्हाधिकारी यांनी खात्री करून कोणत्याही प्रकारची अनियमितता होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

XV. मंजुर कामांची कामनिहाय व मंजूर निधीच्या माहितीची नोंद शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाने स्वतंत्र नोंदवहीत ठेवावी.

XVI. अंमलबजावणी यंत्रणा यांनी केंद्र शासनाच्या पत्रांमध्ये नमूद केलेल्या अटी व शर्तींचे पालन करुन कार्यक्रमाची अंमलबजावणी करावी.

XVII. सदर काम पूर्ण झाल्यावर करण्यात आलेल्या कामांची माहिती PM GATISHAKTI PORTAL वर अद्ययावत करावी.

XVIII. अंमलबजावणी यंत्रणा सदर कामांचे Geo- tagging करेल.

XIX. व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ हे सदर कामांचा दर तीन महिन्यांनी नियमित आढावा घेऊन तसेच कामांच्या पुर्ततेनंतर Geo-tagged photographs सह कार्यपुर्तता अहवाल शासनास सादर करतील .

२. या कामांची निविदा प्रक्रिया प्रचलित कार्यपद्धती/नियमांचे पालन करुन करण्यात यावी.

३. सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी व्यवस्थापकीय संचालक, शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळ यांना अंमलबजावणी व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. अंमलबजावणी यंत्रणा व नियंत्रक अधिकारी यांनी संबंधित प्रकल्प अधिकारी यांच्या सहकार्याने सदर कामे विहीत मुदतीत पूर्ण करुन त्याची उपयोगिता प्रमाणपत्रे आर्थिक व भौतिक अहवालासह विहित नमुन्यात आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्यामार्फत सादर करावीत. संबंधित प्रकल्प अधिकारी, यांनी अंमलबजावणी यंत्रणा व नियंत्रक अधिकारी यांना आवश्यकतेनुसार वेळोवेळी सहकार्य करुन सदर कामे केंद्र शासनाच्या निर्देशानुसार पार पडत आहेत, याची काळजी घ्यावी.

४. कामाच्या प्रगतीचा आढावा घेऊन आवश्यक निधीची मागणी शासनाकडे करण्यात यावी. त्यानुसार निधी वितरण करण्यात येईल.

५. सदर काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबत सध्याची इमारत तसेच भौतिक प्रगतीचे फोटो व चित्रफिती (Video clips) बनवून ती विभागाच्या संकेतस्थळावर प्रसारीत करण्याची जबाबदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेची राहील. प्रस्तुत कामे पूर्ण झाल्यानंतर कामाच्या ठिकाणी सदरील काम केंद्रीय योजनेतून पूर्ण केले असल्याबाबतचा फलक लावण्यात यावा .

६. सदर प्रशासकीय मान्यता शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८, विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रस्तृत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-१, उपविभाग-५, अनुक्रमांक १ नियम क्र.१३४ मधील तरतदीनुसार तसेच शासन परिपत्रक नियोजन विभाग क्र. ससमा २०१०/ प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ अन्वये

प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन  देण्यात येत आहे.

७. सदर योजनेसाठी केंद्र शासनाने मंजूर केलेला रु.१३७५.०० लक्ष इतका निधी भारतीय संविधानाच्या अनुच्छेद  (१) २७५अंतर्गत अनुदान या योजनेंतर्गत सन २०२४-२५ करिता केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीतून तर ऊर्वरित रु.९९९.०५ लक्ष इतका निधी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मुल्यमापन व संनियंत्रण (लेखाशीर्ष क्र. २२२५ एफ़ २८१) या लेखाशिर्षाखालील मंजूर निधीतून उपलब्ध करुन देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५३०१७१५१५४७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN SHRIPATI KHANDEKAR

Digitally signed by SACHIN SHRIPATI KHANDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=22255a34cff0713981179442f0ceb1132d8d35bdb843b1f7aaab4ab21c1c5154, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=752F5B5CA7204855AC124E7354BAF19407343EA2B436448745D6FC6F481AF2BA, cn=SACHIN SHRIPATI KHANDEKAR
Date: 2025.05.30 17:16:34 +05'30'

**(स. श्री. खांडेकर)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.४०० ०३२.
३. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
४. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
६. मा. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७. मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (वित्त विभाग, नियोजन विभाग, ग्रामविकास विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय,  मुंबई.
८. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
९. सर्व उप सचिव/अवर सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ मर्या. नाशिक
१२. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य
१३. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१४. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१५. महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती (का-१९) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०० ०३२.